**जिल्हा व सत्र न्यायालय, सातारा या न्यायालयीन इमारतीच्या बाहयदर्शनी भागातील खिडक्यांच्या कामासाठी निधी वितरण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण- ०११७/१०४२/प्र.क्र.११/का-११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दि. २१ सप्टेंबर, २०१८.

<u>वाचा</u>:- १) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय समक्रमांक दि.१४.५.२०१८.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पूरक २०१८/प्र.क्र.९५/अर्थ-३, दि.२७.७.२०१८.

**<u>प्रस्तावना:-</u>**

मा.उच्च न्यायालयाच्या प्रस्तावानुसार जिल्हा व सत्र न्यायालय, सातारा येथील खिडक्या व रस्त्यांची दुरुस्ती करण्याबाबत अनुक्रमे रु. ३१,०७,६२८/- व रु. १५,१३,०८०/- अशा एकूण रु. ४६,२०,७०८/- इतक्या रक्कमेस शासन निर्णय दि. १४.५.२०१८ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.सदर शासन निर्णयामध्ये निधी उपलब्धतेबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील असे नमूद केले होते.

जिल्हा न्यायालय, सातारा यांनी रस्त्यांच्या दुरुस्तीचे काम सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करुन घेतल्याचे कळविल्यामुळे रस्त्यांची दुरुस्ती करिता लागणारी रु. १५,१३,०८०/- इतकी रक्कम वगळून उर्वरित रक्कमेच्या पुरवणी मागणीचा प्रस्ताव जुलै २०१८ च्या पावसाळी अधिवेशनात वित्त विभागामार्फत विधानमंडळास सादर करण्यात आला होता. त्यानुसार जिल्हा व सत्र न्यायालय, सातारा या न्यायालयातील बाहयदर्शनी खिडक्यांच्या कामासाठी निधी उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

जिल्हा व सत्र न्यायालय, सातारा या न्यायालयातील बाहयदर्शनी खिडक्यांच्या कामासाठी रु. ३१,०७,६२८/- इतक्या रक्कमेची पुरवणी मागणी विधानमंडळाने मंजूरी केलेली आहे.

२. सदर पुरवणी मागणी, मागणी क्र.जे-१, २०१४ न्यायदान, १०५- दिवाणी व सत्र न्यायालये, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधीश,(०२)(०१) जिल्हा व सत्र न्यायाधीश (अनिवार्य) (२०१४ ०१७२) २७ - लहान बांधकामे या लेखाशिर्षाखाली मंजूर झालेली आहे. त्यानुसार सदर पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेला रु. ३१,०७,६२८/- इतका निधी नियंत्रक अधिकारी प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, सातारा यांना (जे-००२४ ) याद्वारे वितरीत करण्यात येत आहे. तसेच सदर कामाकरीता येणारा खर्च सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ६६७/२०१८/व्यय- ५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९२११५५०४९८५१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Santosh Sampatti Navagire

Digitally signed by Santosh Sampatti Navagire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=214b4345a2842afe7dd0cbda9e8d83579cbedaaaef30f215ceda096e4e407797, serialNumber=0cb1b0de020015cf6d1f800579271f4816460b1802c2ae247dd6dd6f47462cd3, cn=Santosh Sampatti Navagire
Date: 2018.09.21 15:53:02 +05'30'

**( सं.सं.नवगिरे )**

कार्यासन अधिकारी

**प्रति,**

१) मा.प्रबंधक (निरिक्षणे- १), उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)

२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश,सातारा.

३) महालेखापाल (लेखापरिक्षा व लेखा अनुज्ञेयता ) महाराष्ट्र-१, मुंबई.

४) जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.

५) वित्त विभाग, कार्यासन-व्यय ५, मंत्रालय, मुंबई.

६) विधी व न्याय विभाग कार्या- २३ व २४ मंत्रालय, मुंबई.

७) निवडनस्ती.